

स्मरणपत्र-१

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
मंत्रालय (विस्तार), दालन क्र.५५७, ५ वा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई-४०० ०३२.

दूरध्वनी क्रमांक-२२७९३३४४ Email ID : desk१४gad-mh@gov.in

.................................................................................................................................

क्रमांक: प्रतिनि-१०२१/प्र.क्र.१४१/का.१४ दिनांक : १६/०२/२०२२

प्रति,
सह /उप सचिव,
सर्व मंत्रालयीन विभाग (आस्थापना),
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

विषय : महाराष्ट्र राज्य महिला आयोगातील “उप सचिव” हे पद प्रतिनियुक्तीने भरण्याबाबत.
मंत्रालयीन उप सचिव यांच्याकडून इच्छुक्ता मागविण्याबाबत.

संदर्भ : शासन समक्रमांकित दि.१८.११.२०२१ चे पत्र.

महोदय/ महोदया,

महिला व बाल विकास विभागाच्या अखत्यारीतील महाराष्ट्र राज्य महिला आयोगातील “उप सचिव” हे पद (वेतनस्तर एस-२५: ७८,८००-२,०९,२००/-)मंत्रालयीन विभागातील उप सचिव संवर्गातील अधिकाऱ्यांमधून प्रतिनियुक्तीने भरावयाचे आहे. त्यानुषंगाने संदर्भाधिन पत्रान्वये मंत्रालयीन विभागातील उप सचिव संवर्गातील अधिकाऱ्यांकडून इच्छुकता मागविण्यात आल्या होत्या.

२. मात्र अद्यापि कोणत्याही अधिकाऱ्यांची इच्छुकता प्राप्त झालेली नाही. आता पुन्हा सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना विनंती करण्यात येते की, महाराष्ट्र राज्य महिला आयोगातील “उप सचिव” या पदावर प्रतिनियुक्तीने जाण्यासाठी इच्छुक असलेल्या आपल्या विभागातील उप सचिवांची नावे, त्यांचे मागील पाच वर्षांच्या गोपनीय अहवालांच्या प्रमाणित प्रतींसह, वैयक्तिक माहिती (Bio-data), संपूर्ण सेवा तपशील (कालावधी, विभाग, पद), ना-विभागीय चौकशीचे प्रमाणपत्र व विभागाचे ना-हरकत प्रमाणपत्र इत्यादी माहिती या विभागाकडे दि.२५.०२.२०२२ पर्यंत निश्चितपणे प्राप्त होतील अशा रितीने पाठविण्यात यावी. तसेच कोणीही अधिकारी इच्छुक नसल्यास निरंक असेही या विभागास कळवावे, ही विनंती.

३. सदर पत्राची प्रत महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आली असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०२१६१५१६५१५९०७ असा आहे. सदर पत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

आपला,

Prashant Shridhar Shelar

Digitally signed by Prashant Shridhar Shelar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8808a7686c8d5106a1fe553bcee5455c94da9b2df26765e2297b06d021a026aa, serialNumber=ca04078fb06f0081dfbd03e54745e990386674b41f0fcfe82c712fd283e6d114, cn=Prashant Shridhar Shelar
Date: 2022.02.16 15:50:23 +05'30'

**(प्र. श्री. शेलार)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**सोबत : विवरणपत्र**

**प्रत-** निवडनस्ती सा.प्र.वि./कार्यासन-१४

**विवरणपत्र**

| अ.क्र. | मुद्दा | तपशिल/अभिप्राय |
|---|---|---|
| १ | अधिकारी/ कर्मचाऱ्यांचे संपूर्ण नाव | |
| २ | जन्मदिनांक | |
| ३ | शैक्षणिक अर्हता | |
| ४ | स्थायित्व प्रमाणपत्र | |
| ५ | भ्रमणध्वनी क्रमांक | |
| ६ | मागील ५ वर्षाच्या गोपनीय अहवालाच्या छायाप्रती (मूळ गोपनीय अहवाल पाठवू नयेत.) | |
| ७ | मत्ता व दायित्वे सादर केली आहेत का? | |
| ८ | ५०/५५ व्या वर्षी पुनर्विलोकन केले आहे का? (लागू असल्यास) | |
| ९ | संबंधित अधिकाऱ्याला यापूर्वी प्रतिनियुक्ती दिली असल्यास तपशील (पद व कालावधी) (प्रतिनियुक्तीचा एकूण कालावधी १० वर्षापेक्षा जास्त नसावा) | <table><tr><td>दिनांकापासून ते दिनांकापर्यंत</td><td rowspan="3">पद /प्रतिनियुक्तीचे ठिकाण</td></tr><tr><td></td></tr><tr><td></td></tr><tr><td colspan="2">एकूण कालावधी</td></tr></table> |
| १० | मागील प्रतिनियुक्तीवरून परत आल्याच्या दिनांकापासून ३ वर्षे पूर्ण झाली आहेत का? | |
| ११ | संबंधित अधिकाऱ्यांविरूध्द विभागीय चौकशी सुरू अथवा प्रस्तावित आहे काय? | |
| १२ | प्रतिनियुक्तीकरीता निवड झाल्यास विभाग कार्यमुक्त करेल किंवा कसे. | |